**मुख्य कार्यकारी अधिकरी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांच्या प्रवास खर्चासाठी अनुदान वितरित करणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०१७/प्र.क्र. ३३/कार्या-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १६ मार्च, २०१७

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः बियुडी २०१७/प्र.क्र.३३/का-४, दि.६ फेब्रुवारी, २०१७
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं २०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.८ फेब्रुवारी,२०१७
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः अविवि २०१६/प्र.क्र.१०६/का-७, दि.१० मार्च, २०१७

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या कार्यालयास सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून प्रवास खर्चास अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

वरील संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकातील तरतुदीस अनसरुन, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या रु.१५,९७,०००/- (रुपये पंधरा लाख सत्याण्णव हजार मात्र ) इतक्या योजनांत्तर्गत अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ८०% इतक्या मर्यादेत राहून वरील संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.३,९४,५६०/- (रुपये तीन लाख चौऱ्याण्णव हजार पाचशे साठ मात्र) इतके अनुदान वितरित करण्यात आलेले आहे. आता वक्फ मंडळाने मागणी केल्यानुसार संदर्भ क्र.३ व ४ येथील मान्यतेस अनुसरुन “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०२) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, आस्थापना खर्च (२०५३१२६७) योजनेत्तर, ११ देशांतर्गत प्रवास खर्च” या लेखाशिर्षाखाली रु.४५,०००/-(रुपये पंचेचाळीस हजार मात्र) इतके अनुदान मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

२. उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०२) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, आस्थापना खर्च (२०५३१२६७) योजनेत्तर, ११ देशांतर्गत प्रवास खर्च” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक अर्थसं २०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.८, दि.८ फेब्रुवारी,२०१७ आणि शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः अविवि २०१६/प्र.क्र.१०६/का-७, दि.१० मार्च, २०१७ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६१२०३४१०८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2017.03.16 14:43:07 +05'30'

(अनिस शेख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
७. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.